**जंगल कामगार सहकारी संस्थेमार्फत कुप कामासाठी लागणाऱ्या कर्मचारी वृंदाची १५६ अस्थायी पदे सन २०२०-२१ मध्ये पुढे चालू ठेवण्यास मुदतवाढ देण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**महसूल व वन विभाग**
**शासन निर्णय क्र. संकीर्ण-२०२०/प्र.क्र.४१/फ-९**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
दिनांक :- २५ सप्टेंबर, २०२०

वाचा :-

१. उपवनसंरक्षक (संसाधन उपयोग) नागपूर यांचे पत्र क्रमांक कक्ष-११/जंकास/प्र.क्र.२(१९-२०)/G-१८३८/२०१९-२०, दिनांक २४.०२.२०२०
२. महसूल व वन विभाग, शासन निर्णय क्र. एमएफएस-२०१७/प्र.क्र.७७/फ-८, दि.१३.०९.२०१९
३. वित्त विभाग, शासन निर्णय क्र.पदनि-२०१६/प्र.क्र.८/१६/आ.पु.क., दिनांक १२.०२.२०२०
४. महसूल व वन विभाग, शासन निर्णय क्र. संकीर्ण-२०२०/प्र.क्र.४१/फ-९, दि.३०.०३.२०२०
५. वित्त विभाग, शासन निर्णय क्र.पदनि-२०१६/प्र.क्र.८/१६/आ.पु.क., दिनांक ३१.०८.२०२०
६. मुख्य वनसंरक्षक (अर्थसंकल्प, नियोजन व विकास), महाराष्ट्र राज्य, नागपूर यांचे पत्र क्रमांक कक्ष-३/योजनेत्तर/प्र.क्र.०१/१९-२०/५८, दिनांक ०७.०९.२०२०

शासन निर्णय :-

उपवनसंरक्षक (संसाधन उपयोग) नागपूर यांनी संदर्भ क्र.१ व मुख्य वनसंरक्षक (अर्थसंकल्प, नियोजन व विकास), महाराष्ट्र राज्य, नागपूर यांनी संदर्भ क्र. ६ अन्वये महाराष्ट्र राज्यातील जंगल कामगार सहकारी संस्थांमार्फत कुप कामासाठी आवश्यक असणाऱ्या १५६ अस्थायी पदांना सन २०२०-२१ या आर्थिक वर्षामध्ये दिनांक ०१.०३.२०२० ते २८.०२.२०२१ पर्यंत पुढे चालु ठेवण्यास मंजूरी प्रदान करण्याबाबत विनंती केलेली आहे.

वित्त विभाग संदर्भ क्र.३ च्या शासन निर्णयान्वये विभागास प्रदान केलेल्या अधिकारानुसार संदर्भ क्र.४ च्या शासन निर्णयान्वये **महाराष्ट्र राज्यातील जंगल कामगार सहकारी संस्थांमार्फत कुप कामासाठी आवश्यक असणाऱ्या १५६ अस्थायी पदांना सन २०२०-२१ मध्ये दिनांक ०१.०३.२०२० ते ३१.०८.२०२० पर्यंत** चालू ठेवण्याबाबत मुदतवाढ देण्यात आली आहे.

संदर्भ क्र.५ येथील वित्त विभाग शासन निर्णय दिनांक ३१.०८.२०२० अन्वये सर्व प्रशासकीय विभागांना त्यांच्या आकृतीबंधात समाविष्ट असलेल्या अस्थायी पदांना तसेच, यापुर्वी आढावा मंजूर केल्यानंतर निर्माण करण्यात आलेल्या परंतु,ज्यांचा समावेश आकृत्तीबंधात करण्यात आलेला नाही, अशा अस्तित्वात असलेल्या **सर्व अस्थायी पदांना दिनांक ०१.०९.२०२० ते २८.०२.२०२१ पर्यंत पुढे चालू ठेवण्यास मुदतवाढ देण्याचे अधिकार प्रदान करण्यात आलेले आहेत.**

त्यानुसार **महाराष्ट्र राज्यातील जंगल कामगार सहकारी संस्थांमार्फत कुप कामासाठी लागणाऱ्या कर्मचारी वृंदाच्या १५६ अस्थायी पदांना दि.०१.०९.२०२० ते दि.२८.०२.२०२१ पर्यंत** चालू ठेवण्यास सोबत जोडलेल्या विवरण पत्रानुसार शासनाची मान्यता प्रदान करण्यात येत आहे. सदर मुदतवाढ संदर्भ क्र.२ शासन निर्णयान्वये निश्चित केलेला आकृत्तीबंधात या पदांचा समावेश आहे या अटीच्या अधीन राहून देण्यात येत आहे.

सदर पदांवर होणारा खर्च हा "मागणी क्रमांक सी-७, २४०६- वनीकरण व वन्यजीवन (योजनेत्तर), १०५-वन उत्पादने, (०२) (०३) वनकामगार सहकारी संस्थाकडून पर्यवेक्षण समुपयोजन, वेतन (२४०६ ०५५२ ०१)" या लेखाशीर्षाखाली सन २०२०-२१ मध्ये मंजूर अनुदानातून भागविण्यात यावा. व मान्य होणाऱ्या अर्थसंकल्पीय तरतुदींच्या मर्यादेतच उपरोक्त पदांसाठी खर्च करावा. सदर कालावधी मध्ये त्यांच्या आस्थापनेवरील मंजूर पदांचा आढावा घेवून सुधारीत आकृतीबंधास उच्चस्तरीय सचिव समितीची मान्यता घेणे आवश्यक आहे. या नंतर सुधारीत आकृतीबंध निश्चीत करण्याकरीता कालावधी वाढवून देण्यात येणार नाही.

प्रस्तूत शासन निर्णय हा वित्त विभागाच्या शासन निर्णय, क्रमांक-पदनि २०१६/ प्र.क्र.०८/१६/ आ.पु.क., दि.३१.०८.२०२० अन्वये प्रशासकीय विभागास प्रदान करण्यात आलेल्या अधिकारास अनुसरुन निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२००९२५१५४८०९३५१९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Sunil Laxmanrao Kathole

Digitally signed by Sunil Laxmanrao Kathole
DN: CN = Sunil Laxmanrao Kathole, C = IN, S = Maharashtra, O = Government Of Maharashtra, OU = Revenue And forest Department
Date: 2020.09.25 15:48:26 +05'30'

**( सु. ल. काठोळे )**
कक्ष अधिकारी (वने)
महसूल व वन विभाग

**प्रति,**

१. प्रधान मुख्य वनसंरक्षक (वनबल प्रमुख), महाराष्ट्र राज्य, नागपूर.
२. प्रधान मुख्य वनसंरक्षक (उत्पादन व व्यवस्थापन), महाराष्ट्र राज्य, नागपूर.
३. प्रधान मुख्य वनसंरक्षक (अर्थसंकल्प नियोजन व विकास), महाराष्ट्र राज्य, नागपूर.
४. अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (वन्यजीव), नागपूर.
५. अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (वन्यजीव), मुंबई.
६. मुख्य वनसंरक्षक (संसाधन उपयोग), महाराष्ट्र राज्य, नागपूर.
७. उपवनसंरक्षक (संसाधन उपयोग), महाराष्ट्र राज्य, नागपूर
८. मुख्य वनसंरक्षक (प्रादेशिक), नाशिक / नागपूर / औरंगाबाद / पुणे / ठाणे / अमरावती /यवतमाळ / धुळे / चंद्रपूर / गडचिरोली / कोल्हापूर वनवृत्त.
९. महालेखापाल-१/२ (लेखा परिक्षा/लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र राज्य, मुंबई/नागपूर.
१०. वित्त विभाग, व्यय-१०/वित्तिय सुधारणा- १ कार्यासन, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२
११. कार्यासन अधिकारी, फ-२ कार्यासन, महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
१२. कक्ष अधिकारी ब-१ कार्यासन, महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.
१३. फ-९ कार्यासन, महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२. (निवडनस्ती)

**शासन निर्णय क्रमांक:- संकीर्ण-२०२०/प्र.क्र.४१/फ-९, दिनांक २५ सप्टेंबर, २०२०**

**सोबतचे विवरणपत्र**

**(दि.०१.०९.२०२० ते दि.२८.०२.२०२१ पर्यंत मुदतवाढ देण्यात आलेली पदे)**

| अ.क्र. | पदनाम | पदांची संख्या |
|---|---|---|
| १ | वनरक्षक | ११० |
| २ | लेखापाल | ६ |
| ३ | डेपो आगार लिपिक | ५ |
| ४ | कार्यालय अधिक्षक | १ |
| ५ | लघुटंकलेखक | १ |
| ६ | लिपिक | ८ |
| ७ | शिपाई | १० |
| ८ | पहारेकरी /चौकीदार | १५ |
| | **एकूण :-** | **१५६** |

Sunil Laxmanrao Kathole

Digitally signed by Sunil Laxmanrao Kathole
DN: CN = Sunil Laxmanrao Kathole, C = IN, S = Maharashtra, O = Government Of Maharashtra, OU = Revenue And forest Department
Date: 2020.09.25 15:48:46 +05'30'

**( सु. ल. काठोळे )**
कक्ष अधिकारी (वने)
महसूल व वन विभाग

************************